<u>वितरण आदेश क्र.१</u>

**जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-शासन मधील अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन व भत्ते भागविण्याकरीता सन २०१६-२०१७ मधील केंद्र शासनाचा हिस्सा वितरीत करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः जिग्राप्र-२०१६/प्र.क्र-६९/योजना-५

बांधकाम भवन इमारत,तळमजला
२५,मर्झबान पथ, फोर्ट,मुंबई-४०० ००१.
दिनांक : २३ मे,२०१७

**<u>वाचा :</u>**

१) केंद्र शासनाचे आदेश क्र:१७०१४/१/२०१६-१७/DRDA(Sl.No.१४), दि.१० जुन, २०१६.
२) केंद्र शासनाचे आदेश क्र: १७०१४/१४/२०१६-१७/DRDA(Sl.No.६३), दि. ७ नोव्हें,२०१६
३) केंद्र शासनाचे आदेश क्र.:१७०१४/१४/२०१६-१७/DRDA(Sl.No.७२), दि.२६ डिसें,२०१६
४) शासन निर्णय क्र.: जिग्राप्र-२०१६/प्र.क्र.६९/योजना-५, दिनांक ४ जुलै,२०१६.
५) शासन निर्णय क्र.: जिग्राप्र-२०१६/प्र.क्र.६९/योजना-५, दिनांक ६ डिसेंबर,२०१६.
६) शासन निर्णय क्र.: जिग्राप्र-२०१६/प्र.क्र.६९/योजना-५, दिनांक १७ जानेवारी,२०१७.
७) केंद्र शासनाचे आदेश क्र: १७०१४/०१/२०१६-१७/DRDA(Pt-१)(Sl.No.११९), दि.२८ मार्च, २०१७.
८) केंद्र शासनाचे आदेश क्र.: १७०१४/१४/२०१६-१७/DRDA(Sl.No.१३९), दि.३१ मार्च,२०१७
९) वित्त विभाग परिपत्रक क्र.: अर्थसं-२०१७/प्र.क्र.६८/अर्थसंकल्प-३, दि.०१ एप्रिल, २०१७.
१०) वित्त विभाग परिपत्रक क्र.: अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थसंकल्प-३, दि.१८ एप्रिल, २०१७

**<u>प्रस्तावना :</u>**

जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन ६०:४० अशी केंद्र पुरस्कृत योजना असून, या योजनेंतर्गत केंद्र शासनाचा ६०% हिश्याचा निधी थेट जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी प्राप्त होणारा हिस्सा राज्याच्या अर्थसंकल्पात दर्शवून त्याचे वितरण सर्व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना करण्याचे केंद्र शासनाचे निदेश आहेत.

सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरीता जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणामधील अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन व भत्ते अदा करण्याकरीता केंद्र शासनाचा हिस्सा वरील संदर्भ क्र.७ व ८ अन्वये वितरित करण्यात आला आहे. तथापि, सदर निधी विहित वेळेत राज्याच्या एकत्रित निधीमध्ये जमा न झाल्याने जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना वितरित करता आले नाही. सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरीता जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांमधील अधिकारी व कर्मचारी यांच्या वेतन व भत्ता भागविण्यासाठी केंद्र शासनाचा हिस्सा सन २०१७-१८ या आर्थिक वर्षामधील

अर्थसंकल्पीय तरतूदीमधून जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना बी.डी.एस. मार्फत वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :**

१. ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार यांच्या वरील संदर्भ क्र.७ अन्वये सन २०१६-२०१७ या वर्षाकरीता जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणामधील अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन व भत्ते अदा करण्याकरीता केंद्र शासनाकडून (६०% केंद्र पुरस्कृत योजना) या योजनेंतर्गत अतिरिक्त अनुदानाचा केंद्र हिस्सा रुपये ५२४.२० लक्ष इतके अनुदान प्राप्त झाले आहे. तसेच ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार यांचे वरील संदर्भ क्र.८ अन्वये सन २०१६-१७ या वर्षाकरीता नाशिक जिल्ह्याकरीता रुपये २०.२६ लक्ष इतका दुसरा हप्त्याचे अनुदान प्राप्त झाले आहे. एकूण रक्कम रुपये ५४४.४६ लक्ष इतके निधी म्हणून मंजूर झाले आहे.

२. सन २०१७-२०१८ या आर्थिक वर्षामधील अर्थसंकल्पीय तरतूदीमधून जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन मधील अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन व भत्ते भागविण्याकरीता सन २०१६-१७ मधील केंद्र शासनाचा हिस्सा रुपये ५४४.४६/- लक्ष इतके अनुदान संबंधित जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्याकडे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून दिनांक २५ मे,२०१७ रोजी सुपूर्द करण्यात येत आहेत. सदर खर्च ग्राम विकास व जलसंधारण विभाग मागणी क्र.एल-३, २५०१-ग्रामीण विकासासाठी विशेष कार्यक्रम, ०१-एकात्मीकृत ग्राम विकास कार्यक्रम, ००१-संचालन व प्रशासन, (००) गट पातळीवरील यंत्रणा अधिक बळकट करणे, (००)(०३) जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन (योजनांतर्गत), (६०% केंद्र पुरस्कृत योजना), ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (केंद्र हिस्सा), (२५०१ २९१७) या लेखाशिर्षाखाली सन २०१७-२०१८ च्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. हे अनुदान ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे, अन्यथा ती वित्तीय अनियमितता समजण्यात येईल, याची अंमलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी. तसेच सदर निधी खर्च न झाल्यास संबंधित अधिकाऱ्यास जबाबदार धरण्यात येईल, याची कृपया नोंद घ्यावी.

४. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान सर्व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीव्दारे (B.D.S.) वितरीत करण्यात येत आहे.

५. सदरहु अनुदान कोषागारातून काढल्यानंतर प्रकल्प संचालकांनी पुढील माहिती- १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक त्वरित लेखाधिकारी, कार्यासन क्र.योजना-२, बांधकाम भवन, २५-मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-४०० ००१ यांच्याकडे पाठवावी.

६. सर्व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन मधील अधिकारी व कर्मचारी यांच्या रिक्त पदांची अद्ययावत माहिती विहीत प्रपत्रात शासनास दरमहा खर्चाच्या मासिक अहवाला-सोबत पाठविणे अनिवार्य आहे.

७. सर्व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन मधील अधिकारी व कर्मचारी यांच्या रिक्त पदांची माहिती केंद्र शासनाच्या www.rural.nic.in या संकेतस्थळावर दरमहा अद्ययावत करुन त्याची प्रत शासनास पाठविण्यात यावी.

८. सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांनी या आदेशान्वये या प्रकरणी प्राप्त झालेल्या केंद्र शासनाच्या हिश्शाची राज्य समरुप हिस्सा जिल्हा नियोजन समितीकडून प्राप्त करुन घेण्यात यावा.

९. सदर निधी खर्च झाल्याचा उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत शासनास पाठविण्यात यावी.

१०. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक १८ एप्रिल,२०१७ च्या शासन परिपत्रका-मधील तपासणी सूचीतील अटी व परिच्छेद १८ मधील अटीच्या अधीन राहून तसेच वित्त विभाग अनौपचारीक सं.क्र.२५९/२०१७/व्यय-१५, दि.१५ मे,२०१७ च्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201705231330253520 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सोबत :- जिल्हानिहाय विवरण पत्र जोडले आहे.

Arunkumar S Pawar

Digitally signed by Arunkumar S Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Arunkumar S Pawar
Date: 2017.05.25 15:50:05 +05'30'

**(अरुण शं.पवार)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालये (सर्व)
२. महालेखापाल (लेखापरिक्षा) व (लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१,मुंबई.
३. महालेखापाल (लेखापरिक्षा) व (लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२,नागपूर.
४. संचालक, लेखा व कोषागार, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. संचालक, निवासी व लेखा कोषागार, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व).
७. उप आयुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालये (सर्व)
८. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व).

९. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).

१०.मुख्य लेखापरिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.

११.वित्त विभाग (व्यय-१५/अर्थ-१७), मंत्रालय, मुंबई.

१२.वरिष्ठ लेखाधिकारी, शासनस्तर अंतर्गत लेखा परिक्षण पथक, बांधकाम भवन, मुंबई.

१३.कक्ष अधिकारी, (योजना-१/२/३/४/५/६/७/८/९/१०), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, बांधकाम भवन, मुंबई-०१.

१४.कक्ष अधिकारी, (वित्त-१/२/३/४/५/६/७/८/९) ग्रामविकास व जलसंधारण विभाग, बांधकाम भवन, मुंबई-०१.

१५.निवडनस्ती (कार्यासन-योजना-५).

**शासन निर्णय क्र.जिग्राप्र-२०१६/प्र.क्र-६९/योजना-५, दिनांक २३ मे,२०१७**
**सोबतचे विवरण पत्र.**

(रुपये लाखात)

| अ.क्र. | जिल्हा | वेतन व भत्ते (पहिला हप्ता) |
|---|---|---|
| १. | अहमदनगर | १९.०० |
| २. | अकोला | १६.६६ |
| ३. | अमरावती | १९.०० |
| ४. | औरंगाबाद | १६.६६ |
| ५. | भंडारा | १६.६६ |
| ६. | बुलडाणा | १९.०० |
| ७. | चंद्रपूर | १९.०० |
| ८. | धुळे | १३.४८ |
| ९. | गडचिरोली | १९.०० |
| १०. | हिंगोली | १३.४८ |
| ११. | जळगांव | १९.०० |
| १२. | जालना | १६.६६ |
| १३. | कोल्हापूर | १९.०० |
| १४. | लातूर | १६.६६ |
| १५. | नागपूर | १९.०० |
| १६. | नांदेड | १९.५९ |
| १७. | नंदूरबार | १६.६६ |
| १८. | उस्मानाबाद | १६.६६ |
| १९. | परभणी | १६.६६ |
| २०. | पुणे | १९.०० |
| २१. | रायगड | १९.०० |
| २२. | रत्नागिरी | १६.६६ |
| २३. | सांगली | १६.६६ |
| २४. | सातारा | १९.०० |
| २५. | सिंधुदूर्ग | १६.६६ |
| २६. | सोलापूर | १९.०० |
| २७. | ठाणे | १३.४८ |
| २८. | वर्धा | १६.६६ |
| २९. | वाशिम | १६.६६ |

| | | |
|---|---|---|
| ३०. | यवतमाळ | १९.५९ |
| ३१ | नाशिक | २०.२६ |
| | **एकूण** | **५४४.४६** |

(रुपये पाच कोटी, चव्वेचाळीस लक्ष, सेहेचाळीस हजार फक्त)

Arunkumar S Pawar

Digitally signed by Arunkumar S Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Arunkumar S Pawar
Date: 2017.05.25 15:50:37 +05'30'

**(अरुण शं.पवार)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन